**आपत्ती व्यवस्थापन विभागातील सर्वसमावेशक आपत्ती नियोजन, व्यवस्थापन व प्रतिसाद यासाठी तांत्रिक सहाय्य आणि त्याच्या अंमलबजावणी याकरीता विभागाने नियुक्त केलेल्या मे.पॅलेडियम कन्सलटिंग इंडिया प्रा.लि. या कंपनीने सादर केलेल्या मासिक प्रगती अहवालांचा आढावा घेण्याकरीता समिती गठीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**(आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन)**
**शासन निर्णय क्रमांक : आव्यप्र- २०२४/ प्र.क्र.४८/ आव्यप्र-२,**
पहिला मजला, मुख्य इमारत, हुतात्मा राजगुरु चौक,मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
दिनांक : १ जुलै, २०२४

**वाचा :-**

१) विभागाचा शासन निर्णय क्र. आव्यप्र-२०२१/प्र.क्र.१७६ /आव्यप्र-१, दि.१०.११.२०२१.
२) दि.१६.०६.२०२२ रोजी प्रसिद्ध केलेला Expression Of Interest (EOI).
३) दि.२१.१०.२०२२ रोजी निर्गमित केलेला Request for Proposal.
४) दि.२०.०१.२०२३ रोजीच्या राज्य कार्यकारी समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.
५) पी.एम.यु. नियुक्तीबाबतचे शासन पत्र क्र.DMU-२०२२/C.R. २७/DMU-२ दि.३१.०१.२०२३ रोजीचे.
६) मे.पॅलेडियम कन्सलटिंग इंडिया प्रा.लि. कंपनीसोबत दि.२३.०३.२०२३ रोजी केलेला करार.
७) प्रशासकीय मान्यतेबाबतचा शासन निर्णय क्र. आव्यप्र-२०२४/प्र.क्र.४८/आव्यप्र-२, दि.२८ मार्च, २०२४.

**<u>प्रस्तावना :</u>**

दि.१०.११.२०२१ च्या शासन निर्णयान्वये आपत्ती व्यवस्थापन विभागातील सर्वसमावेशक आपत्ती नियोजन, व्यवस्थापन व प्रतिसाद यासाठी तांत्रिक सहाय्य आणि त्याच्या अंमलबजावणी करीता मा. मंत्री मंडळाच्या मान्यतेने प्रोजेक्ट मॅनेजमेंट युनिट (PMU) नेमण्याचा निर्णय घेतला. त्यानुसार पी.एम.यू. नेमण्यासाठी विभागाने दि. १६.१०.२०२२ रोजी Expression Of Interest (EOI) प्रसिध्द करुन कंपन्यांकडून अर्ज मागविले होते व त्यानुसार आर.एफ.पी. (Request for Proposal) प्रसिध्द करुन प्रस्ताव मागविले होते. प्राप्त प्रस्तावापैकी मे.पॅलेडियम कन्सलटिंग इंडिया प्रा.लि. ही कंपनी पात्र ठरली. त्यानुसार सदर कंपनीच्या नियुक्ती बाबतचा राज्य कार्यकारी समितीची मान्यता घेण्यात आली. त्यानुसार दि. ३१.०१.२०२३ रोजी ४ वर्षांकरीता नियुक्तीबाबत नियुक्तीपत्र देण्यात आले. कंपनीला Contract Value रु.४२,०४,७०,०००/- (बेचाळीस कोटी चार लाख सत्तर हजार) (टॅक्सेस वगळून) इतकी देण्याचे प्रस्तावित आहे. कंपनीने त्यासाठीच्या दि.०६.०३.२०२३ रोजीच्या पत्रान्वये Contract Value च्या ५% इतक्या रकमेची म्हणजे रु. २,१०,२३,५००/- (दोन कोटी दहा लाख तेवीस हजार पाचशे) रुपयांची बँक

गॅरंटी सादर केली त्यानुसार कंपनीसोबत दि. २३.०३.२०२३ रोजी (Contract Agreement) केला आहे. सदर कंपनीला ४ वर्षामध्ये देय असलेली Contract Value रु.४२,०४,७०,०००/- (बेचाळीस कोटी चार लाख सत्तर हजार) (टॅक्सेस वगळून) इतकी आहे व Provisional Sum And Contingency याकरीता रु. ४ कोटी अशी एकंदरीत ४२,०४,७०,००० + ४,००,००,००० = ४६,०४,७०,००० अशी रक्कम येते. त्यामध्ये १८ टक्के जी.एस.टी. चा सामावेश केल्यानंतर ४६,०४,७०,००० + ८,२८,८४,६०० (१८% GST) = ५४,३३,५४,६००/- इतक्या रकमेस वित्त विभागाने दिलेल्या कार्योत्तर मंजूरीच्या आधारे प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. मे.पॅलेडियम कन्सलटिंग इंडिया प्रा.लि. यांना दि. ३१ जानेवारी २०२३ रोजी नियुक्ती पत्र देण्यात असले तरी, दि. ३१ मार्च २०२३ पासून कार्यरत झाले असल्याने सदर कंपनीने Inception Report व १२ महिन्याचे मासिक प्रगती अहवाल (Monthly Progress Report) व त्याबाबतची देयके विभागास सादर केली आहेत. प्रकल्प संनियंत्रण गटाने सादर केलेल्या मासिक प्रगती अहवालांचा आढावा घेण्याकरीता समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

दि.१०.११.२०२१ च्या शासन निर्णयान्वये आपत्ती व्यवस्थापन विभागातील सर्वसमावेशक आपत्ती नियोजन, व्यवस्थापन व प्रतिसाद यासाठी तांत्रिक सहाय्य आणि त्याच्या अंमलबजावणी करीता मा. मंत्री मंडळाच्या मान्यतेने प्रोजेक्ट मॅनेजमेंट युनिट (PMU) नेमण्याचा निर्णय घेतला. त्यानुसार विभागाने मे.पॅलेडियम कन्सलटिंग इंडिया प्रा.लि. या कंपनीस प्रकल्प संनियंत्रण गट म्हणून नियुक्त केले आहे. सदर कंपनीने वर्कप्लॅन नुसार केलेल्या कामाचे मासिक प्रगती अहवाल सादर करणे आवश्यक आहे.

२. प्रकल्प संनियंत्रण गटाने सादर केलेल्या मासिक प्रगती अहवालांचा आढावा घेण्याकरीता खालील प्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे :-

| अ. क्र. | पदनाम | समितीतील पदनाम |
|---|---|---|
| १ | संचालक | अध्यक्ष |
| २ | वित्तीय सल्लागार तथा सह सचिव | सदस्य |
| ३ | अवर सचिव, आव्यप्र-१ | सदस्य |
| ४ | कक्ष अधिकारी, मंनिक-१ | सदस्य |
| ५ | यु.एन.डी.पी. सल्लागार | सदस्य |
| ६ | चार्टड अकाऊंटट | सदस्य |
| ७ | अन्य अधिकारी (आवश्यकतेनुसार) | निमंत्रित सदस्य |
| ८ | कक्ष अधिकारी, आव्यप्र-२ | सदस्य सचिव |

**३.** सदरहू समिती प्रकल्प संनियंत्रण गटाने सादर केलेले मासिक प्रगती अहवालांचा आढावा घेऊन पीएमयु च्या ४८ महिन्यांच्या वर्कप्लॅन मध्ये विहित करण्यात आलेली कामे पूर्ण झाली आहेत किंवा कसे, हे निश्चित करुन त्यानुसार त्यांचा निर्णय देईल. सदर समितीच्या अहवालाच्या आधारे प्रकल्प संनियंत्रण गटाचे देयक अदा करण्याबाबतची कार्यवाही करावी.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२४०७०११८३२०५३८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANDEEP NAMDEO KAMBLE

Digitally signed by SANDEEP NAMDEO KAMBLE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=b397fcb3ef8423557755d7d4cf38232e23ade4cc99bcaf818e1f49cebd842804, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BA1E056AD55B2F343783A4C13760C8EEF1236DF77EBD34A5CC6127A29F1650B1, cn=SANDEEP NAMDEO KAMBLE
Date: 2024.07.01 18:43:07 +05'30'

**( संदीप ना. कांबळे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. प्रधान सचिव, आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन विभाग, यांचे स्वीय सहायक मंत्रालय, मुंबई.
२. संचालक, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, आ.व्य., म. व पु. यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
४. महालेखापाल (लेखापरीक्षा), मुंबई/ नागपूर.
५. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
६. सह सचिव तथा वित्तीय सल्लागार, आ.व्य., म. व पु. वि., मंत्रालय, मुंबई.
७. अवर सचिव (आव्यप्र-१), मदत व पुनर्वसन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. लेखाधिकारी, (आव्यप्र-६), आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई.
९. मे.पॅलेडियम कन्सलटिंग इंडिया प्रायव्हेट लिमिटेड कंपनी.
१०. निवडनस्ती, आव्यप्र-२, मदत व पुनर्वसन विभाग, मंत्रालय, मुंबई.